“प्रकल्प अंमलबजावणी समितीची (Project Implementation Committee) स्थापना करण्याबाबत”

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : सीईएल-२०१५/प्र. क्र. ५२३/१५/३३
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : ३० ऑक्टोबर, २०१५

**प्रस्तावना:-**

भारत निवडणूक आयोगाच्या नियंत्रणाखाली महाराष्ट्र राज्यामध्ये लोकसभा/राज्यसभा आणि विधानसभा/विधानपरिषद सभासदत्वासाठी सार्वत्रिक निवडणूकांचा तसेच पोट निवडणूकांचा कार्यक्रम पार पाडण्याची जबाबदारी मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य यांचे वर सोपविण्यात आली आहे. या अनुषंगाने महाराष्ट्रातील नागरीकांच्या /मतदारांच्या माहितीसाठी मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र यांची वेबसाईटwww.ceo.maharashtra.gov.in कार्यरत आहे. राज्य शासनाच्या ई प्रशासन धोरणानुसार शासकीय विभागांनी तयार केलेल्या वेबसाईट ह्या प्रमाणकानुसार असणे अनिवार्य आहे. यास्तव मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र यांची सदरहू वेबसाईट प्रमाणकानुसार तयार करणे व त्यांचे परिरक्षण करणे इत्यादीसाठी ई-निविदेद्वारे एक अभिकर्ता नेमावयाचा आहे.

२. सदर काम हे पूर्णत: तांत्रिक स्वरुपाचे आहे. त्यामुळे निविदा सूचना तयार करण्यापासून ते निविदांची छाननी करुन व्यावहारीक दृष्टीने सक्षम अभिकर्त्यांची निवड करणे या बाबींसाठी तांत्रिक सल्लागाराची नेमणूक करणे आवश्यक आहे. शासन निर्णय, DIT, दिनांक ०१/७/२०१४ अन्वये e-Governance Programme राबविण्यासाठी शासनाने पुढीलप्रमाणे एकुण ५ प्रख्यात तांत्रिक सल्लागारांचे पॅनल स्थापित केले आहे.

१) M/s Accenture
२) M/s Deloitte
३) M/s Ernst & Young
४) M/s KPMG
५) M/s PWC

३. तरी, उपरोक्त पाच प्रख्यात तांत्रिक सल्लागारांपैकी एका सल्लागाराची निवड करण्यासाठी शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक २१.०९.२०१२ अन्वये विभागाची प्रकल्प अंमलबजावणी समिती (Project Implementation Committee) स्थापन करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वर नमूद केल्याप्रमाणे पाच प्रख्यात तांत्रिक सल्लागारांपैकी एका सल्लागाराची निवड करण्यासाठी पुढीलप्रमाणे प्रकल्प अंमलबजावणी समिती स्थापना करण्यात येत आहे.

प्रधान सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी - अध्यक्ष
सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग किंवा त्यांचे प्रतिनिधी - सदस्य
सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव, वित्त विभाग किंवा त्यांचे प्रतिनिधी - सदस्य
सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव, उद्योग विभाग किंवा त्यांचे प्रतिनिधी - सदस्य
संचालक, माहिती तंत्रज्ञान किंवा त्यांचे प्रतिनिधी - सदस्य
उप सचिव व सह मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य - सदस्य
अवर सचिव व उप मुख्य निवडणूक अधिकारी - सदस्य सचिव

४. सदर समितीने, उपरोक्त पाच प्रख्यात तांत्रिक सल्लागारांना, मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य यांना अपेक्षित असलेल्या कामाची व्याप्ती स्पष्ट करुन, या समितीपुढे सादरीकरण करण्याच्या सूचना द्यावयाच्या आहेत. सदर सादरीकरणा नंतर त्या त्या सल्लागाराचे सादरीकरण व तांत्रिक क्षमता यांचा विचार करुन मुख्य निवडणूकअधिकारी, महाराष्ट्र राज्य यांना व्यवहार्य ठरेल असा सल्लागार नेमण्याची शिफारस करावयाची आहे. या समितीने एक महिन्याचे आत ही कार्यवाही पूर्ण करणे अपेक्षित आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईट www.maharashtra.gov.in वर उपलब्ध आहे. त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१५१०३१११४०१७४३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Shirish Mohod

Digitally signed by Shirish Mohod
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=beb4df218cab93811ed9522b6f8ac2546899b499eb80512bfa5ec939466fb620, cn=Shirish Mohod
Date: 2015.11.03 16:37:32 +05'30'

**(शिरीष मोहोड)**
**अवर सचिव व उप मुख्य निवडणूक अधिकारी,**
**महाराष्ट्र राज्य**

**प्रति,**

१) अ.मु.स., वित्त विभाग, नियोजन विभाग, उद्योग विभाग व माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
२) संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय
३) मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य यांचे स्वीय सहायक
४) उप सचिव व सह मुख्य निवडणूक अधिकारी यांचे स्वीय सहायक
५) निवडनस्ती.

**प्रत** :- कृपया माहितीसाठी

१) मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई-४०० ०३२.
२) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई-४०० ०३२.